केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्यशासनामध्ये शारिरीक दृष्ट्या अपंगांसाठी गट "अ" आणि "ब" [वर्ग १ व २] मधील आरक्षणाकरिता समितीची स्थापना

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.१२/९७/१६-अ;
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २२ एप्रिल, १९९७

शासन निर्णय :-

केंद्र शासनाच्या अपंगांसाठी सेवाभर्तीमध्ये जागा राखून ठेवण्यासंबंधीचे १९९५ चे अधिनियम दिनांक ७.२.९६ पासून अंमलात आलेले असून त्यासंदर्भात राज्य शासनाने क्रमांक-एसआरव्ही-१०७७/३५७६/१४३३/१६-अ, दि. २३ मे, १९७८ ला निर्गमित केलेला शासन निर्णय या अधिनियमाने अधिक्रमित झालेला आहे. केंद्र शासनाच्या अधिनियमानुसार शारिरीकदृष्ट्या अपंगांसाठी गट "अ" आणि "ब" [वर्ग १ व २ ] मधील पदांसाठी आरक्षण करण्याबाबतचा निर्णय शासनाने त्वरित घ्यावा व त्या अधिनियमाच्या कलम ३३ अन्वये अपंगांसाठी ३ टक्के आरक्षण ठेवावे हे बंधनकारक केले आहे. ज्या पदांच्या संदर्भात शारिरीक दृष्ट्या अपंग व्यक्तींना नेमणूका देणे योग्य वाटणार नाही अशी पदे या अधिनियमाच्या तरतूदींमधून वगळण्याचे अधिकार राज्य शासनाला दिलेले असून त्याबाबतची कार्यवाही राज्य शासनातर्फे करावयास पाहिजे. कोठल्या पदांसाठी आरक्षण करता येईल हे निश्चित करण्याबाबत अधिनियमामधील कलम ३२ मध्ये तरतूद केलेली आहे.

२. उपरोक्त संदर्भात याचिका क्र. ४७/९७-श्री. एस. एल. मगारिया विरुध्द महाराष्ट्र शासन - सहायक अभियंता, श्रेणी-२ यांच्या सरळसेवा भरतीबाबत महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी केलेल्या आदेशान्वये शासन स्तरावर बैठक घेण्यात आली. त्यावेळी वरील परिच्छेद - १ मध्ये नमूद केलेल्या बाबींवर विचार करण्यासाठी व त्यासंबंधी अभ्यास करुन निर्णय घेण्यासाठी एक समिती नेमण्याचा निर्णय घेण्यात आला.

या समितीमध्ये खालील अधिकाऱ्यांचा समावेश असेल.

१] प्रधान सचिव/सचिव, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य - अध्यक्ष

२] प्रधान सचिव/सचिव [सेवा], सामान्य प्रशासन विभाग - सदस्य

३] सचिव, पाटबंधारे विभाग - सदस्य

४] सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग - सदस्य

५] सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग - सदस्य

वरील "समितीचे सदस्य सचिव" म्हणून सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग [१६-अ] चे काम पाहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ अ. रा. साळवी ]

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१] मा. राज्यपाल यांचे सचिव,

२] मा. मुख्यमंत्री / उपमुख्यमंत्री यांचे सचिव,

३] सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,

४] सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,

५] समितीचे अध्यक्ष,

६] समितीचे सर्व सदस्य,

७] सर्व प्रधान सचिव/सचिव,

८] सह सचिव/उप सचिव, [१६-अ], सा. प्र. वि.,

९] सर्व मंत्रालयीन विभाग,

१०] निवड नस्ती [१६-अ]